अमरावती जिल्हयातील सन २००७ मधील
अतिवृष्टी / पुरामुळे बाधित झालेल्या
पूनर्वसित गांवमध्ये नागरी सुविधा कामांना
प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.
मौजे बाभळी, दर्यापूर व नालवाडा,
ता. दर्यापूर, जि. अमरावती.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांकः एलएफडी-२०१९/प्र.क्र.१७५/र-१२
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २० एप्रिल, २०२०

वाचा -

१) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.०१/०८/२००९
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/०३/२०११
३) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आव्यप्र २०११/प्र.क्र.९७/ आव्यप्र-२, दि.०२/०९/२०११
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ , दि.१७/०४/२०१५
५) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र: विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/ इमारती-२, दि.१६/१२/२०१५
६) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६
७) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र: उपायु/अका/भु.सं.-२/पुनर्व/प्र.क्र.१७१-ब/८९७/१६, दि.२९/०३/२०१६
८) शासनाचे समक्रमांकाचे दि. २२/११/२०१८ व दि.२७/११/२०१९चे पत्र.
९) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र: उपायु/पुनर्व/भुसं-१/कलि/कावि-४१७/२०१९, दि. २२/१०/२०१९.
१०) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र: उपायु/पुनर्व/भुसं-१/कलि/कावि-४७८/२०१९, दि. ३०/१२/२०१९.
११) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र: उपायु/पुनर्व/भुसं-१/कलि/कावि-२०१/२०२०, दि. १३/०२/२०२०.

प्रस्तावना-

अमरावती जिल्हयातील सन २००७ मधील अतिवृष्टी/ पूरामूळे बाधित झालेल्या गावांचे पुनर्वसन करण्याचा निर्णय दि.०२.०९.२०१४ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. त्यानूसार अमरावती जिल्हयातील ४३ गांवातील ४१२२ घरांच्या पूनर्वसनाला अंतिम: मान्यता प्रदान करण्यात आली आहे. विभागीय आयुक्त, अमरावती यांनी संदर्भाधिन ९, १० व ११ अन्वये अमरावती जिल्हयातील दर्यापूर तालुक्यातील बाभळी, दर्यापूर व नालवाडा या पूर

पुनर्वसित गावांमधील पाणी पुरवठा या नागरी सुविधांच्या कामांची अंदाजपत्रके सर्व त्रुटींची पुर्तता करुन प्रशासकीय मान्यतेस्तव शासनास सादर केली आहेत.

२. संदर्भाधिन क्र. ४ व ६ च्या शासन निर्णयांन्वये वित्त विभागाने वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक ते पाच अंतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये वेळोवेळी सुधारणा केल्या आहेत. सदर सुधारणांनुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार सदर प्रस्तावामध्ये नमूद नागरी सुविधा कामांपैकी देय असलेल्या नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

त्यानुसार, अमरावती जिल्हयातील सन २००७ मधील अतिवृष्टी/ पूरामूळे बाधित झालेल्या दर्यापूर तालुक्यातील बाभळी, दर्यापूर व नालवाडा या पूर पुनर्वसित गावांमधील पाणी पुरवठा या नागरी सुविधांच्या कामांची तालुक्यातील रु. १,०३,५०,८७९/- (रुपये एक कोटी तीन लक्ष पन्नास हजार आठशे एकोणऐंशी फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकांस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे..

| अ. क्र. | तालुका | गावांचे नाव | कामाचे नांव | अंदाजपत्रकातील रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | दर्यापूर | बाभळी | स.न. २०१, २२२ व २३७ मध्ये पाईप लाईन टाकणे, पाण्याची उंच टाकी, लिडींग मेन व वितरण व्यवस्था | ४६,०५,०४५ |
| २ | | दर्यापूर | स.न.३/१ व ५/१ मध्ये पाईप लाईन टाकणे | २६,९१,२३१ |
| ३ | | नालवाडा | स.न.१७० मध्ये पाणी पुरवठा करणे | ३०,५४,६०३ |
| | | | एकूण | **१,०३,५०,८७९** |

१) प्रस्तावात समाविष्ट असलेल्या कामांकरिता गौण खनिज स्वामित्वधनाची वसूली करण्याची जबाबदारी संबंधित कार्यन्वयन यंत्रणेची राहील

२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१ दि.१/८/२००९ व शासन परिपत्रक क्र. आरपीए-०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११ अन्वये पुनर्वसित/ विस्तारीत गावठाणातील नागरी सुविधा पुरविण्यासाठी निर्धारित करण्यात आलेल्या भौतिक मानकांनुसार काम करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

३) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांवर होणारा खर्च मंजूर अंदाजपत्रकापेक्षा/विहीत मर्यादेपेक्षा जास्त होणार नाही याची संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

४) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांसाठीच्या अंदाजपत्रकांत दर्शविलेली कामनिहाय रक्कम तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेनुसार असावी. तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेतील अटींचे विहीत कार्यपध्दतीनुसार पालन होईल, याची संबंधित अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम १९९९ मधील कलम (१८) अन्वये प्रस्तावाधीन नागरी सुविधा सर्व दृष्टीने पूर्ण झाल्यावर व त्याप्रमाणे जिल्हाधिकारी, पुणे यांचेकडून प्रमाणपत्र घेतल्यानंतर संबंधित जिल्हापरिषदेकडे तातडीने हस्तांतरित कराव्यात.

६) पुनर्वसन योजनेतून पुरविण्यात आलेल्या सदर सुविधा अन्य योजनेतून पुनश्चः पुरविल्या जाणार नाहीत, याची विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी/ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तसेच संबंधित यंत्रणा यांनी दक्षता घ्यावी.

७) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांचा उचित दर्जा राखला जाईल, याची प्रकल्प यंत्रणेने दक्षता घ्यावी.

८) उपरोक्त नमूद पुनर्वसित गावांना पुरविण्यात येणाऱ्या नागरी सुविधा यापूर्वी अन्य योजनेतून झालेली नाहीत याबाबत खातरजमा करुन तद्नंतरच संबंधित कार्यकारी अभियंता यांनी कामांची निविदा प्रक्रिया सुरु करावी.

३. <u>निविदा प्रक्रिया व कार्यारंभ आदेश :-</u>

**अ)** कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व जल व्यवस्थापन उपविभाग दर्यापूर जिल्हा अमरावती यांनी प्रस्तुत प्रशासकीय मान्यता आदेशांतील अटींची पूर्तता करुन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया तात्काळ सुरु करावी.

**ब)** कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व जल व्यवस्थापन उपविभाग दर्यापूर जिल्हा अमरावती यांनी प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर निविदा प्राप्त कामांसाठीचे कार्यारंभ आदेश देऊन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत.

४. कार्यकारी अभियंता, कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व जल व्यवस्थापन उपविभाग दर्यापूर जिल्हा अमरावती यांनी वरीलनुसार सुरु करण्यात आलेल्या निविदा प्राप्त नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल(Work Progress Report)/खर्चाच्या प्रगतीचा अहवाल ( Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार व सन २०२०-२०२१ या चालू वित्तीय वर्षाच्या कालावधीत निविदा प्राप्त कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार " मागणी क्रमांक सी-०६, मु. ले. शी. २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०२ पूर, चक्रीवादळे इत्यादी, १०१ अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०४) पूरामुळे बाधित झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा चावडी, विदयुत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ २२२९) ३१ सहायक अनुदाने (वेतनत्तर)" या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२११६३२२१७०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chularam R Nikhare

Digitally signed by Chularam R Nikhare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffbadf353be3592552a31, cn=Chularam R Nikhare
Date: 2020.09.21 16:36:20 +05'30'

**( चुळाराम रा. निखारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) अमरावती विभाग, अमरावती
२. उप आयुक्त (पुनर्वसन), अमरावती
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, अमरावती
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती
५. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व जल व्यवस्थापन उपविभाग दर्यापूर जिल्हा अमरावती
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
९. उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन ) अमरावती
१०. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३/६, मंत्रालय, मुंबई-३२.
११. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१,पी.ए.सी. कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.
१२. निवडनस्ती कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

* * * * *